<u>हरित संकल्पना (Call for Green Ideas) योजना</u>
**मार्गदर्शक सूचना.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इएन्व्ही.२०१६/प्र.क्र.७१ /तां.क.३**
नवीन प्रशासन भवन,१५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चैाक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०८ नोव्हेंबर, २०१६

<u>वाचा -</u>

१. पर्यावरण विभागाचा शासन निर्णय क्रः योजना-२००७/प्र.क्र. ३४/तां.क-३, दिनांक: ३ ऑक्टोबर, २००७
२. योजनेंतर्गत गठीत सुकाणू समितीच्या दि. ११ जुलै, २०१६ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त

<u>प्रस्तावना-</u>

नैसर्गिक साधनसंपत्तीच्या संवर्धनार्थ तसेच पर्यावरण संवर्धनात राज्याच्या स्थानिक गरजा लक्षात घेवून लोकसहभागातून नावीण्यपूर्ण कार्यक्रम राबविण्यासाठी महाराष्ट्र राज्याच्या सुवर्णजयंतीचे निमित्त साधून सन २०१० रोजीच्या जागतिक पर्यावरण दिनी तत्कालिन मा.मंत्री (पर्यावरण) यांनी पर्यावरण विषयक जनजागृती मोठ्या प्रमाणात करण्यासाठी घोषित केल्याप्रमाणे “हरित संकल्पना” या नाविण्यपूर्ण योजनेची प्रायोगिक तत्वावर सुरुवात करण्यात आलेली होती.

सदर प्रायोगिक तत्वावर सुरू करण्यात आलेल्या या योजनेच्या सर्वांगीण आढाव्यानंतर तसेच पर्यावरण विषयक जनजागृतीची सद्यस्थिती विचारात घेऊन “हरित संकल्पना” (ग्रीन आयडीयाज्) या योजनेच्या अंमलबजावणीविषयी कार्यपध्दती सुधारितरित्या सुनिश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

स्थानिक पर्यावरणाशी निगडीत विषयावर जनमानसात जनजागृती करून लोकसहभागाद्वारे प्रत्यक्ष कृतीने समस्येचे निराकरण करण्यात प्राथमिक यश मिळविलेल्या व्यक्ती/शैक्षणिक संस्था/ सार्वजनिक क्षेत्र /ट्रस्ट /अशासकीय संस्था/ सहकारी संस्था/ शासकीय यंत्रणा/ खाजगी संस्था व इतर या सारख्या पर्यावरणस्नेहींना त्यांच्या उपक्रमात आर्थिक सहाय्य देवून प्रकल्पाची व्याप्ती वाढविणे या उद्देशाने हरित संकल्पना ही योजना दि. ०५ जून, २०१७ पासून पुढीलप्रमाणे कार्यन्वित होईल-

**अ) प्रस्ताव निवडीचे निकषः-**

१. हरित संकल्पना या योजनेंतर्गत नाविन्यपूर्ण संकल्पनेवर आधारित असाच प्रस्ताव विचारार्थ घेण्यात येईल. ज्या संकल्पनेवर सद्यस्थितीत विविध संस्था /व्यक्ती यांचेमार्फत

यापूर्वीच कार्यवाही करण्यात येत आहे अशा स्वरूपाच्या सर्वसाधारण जनमानसात रूढ झालेल्या संकल्पनांचा विचार करण्यात येणार नाही.

उदाहरणार्थ- १)

केंद्र वा राज्य शासनाच्या विभागामार्फ़त राबविण्यात येत असलेल्या विविध योजनासंबंधित प्रस्ताव जसे सौर कुकर, सौर चूल, निर्धुर/ सुधारित चुली, सौर दिवे यांचे वाटप, शेततळे, जलयुक्तशिवार,स्वच्छ भारत मिशन संबंधित इ.

२) परसबाग/किचन गार्डन/सांडपाण्यावर किचन गार्डन/गच्चीवरील सेंद्रीय शेती विकसीत करणे वा जनजागृती करणे.

३) वनौषधी, रानटी वनौषधी वनस्पतीच्या नर्सरीची उभारणी करणे, फ़ळबाग लावणे, वनीकरण, वृक्षारोपण, जैवविविधता मंडळाची स्थापना, स्थानिक वनस्पतींची नोंद घेणे, जैवविविधता मोजणी रजिस्टर तयार करणे

४) रासायनिक किटकनाशके, जैविक किटकनाशके, गांडूळखत/सेंद्रिय खत/जैविक खत, नैसर्गिक शेती/ सेंद्रिय शेती, मातीचा पोत सुधारणे याबाबत जनजागृती

५) पर्यावरण संबंधित बाबी तथा जल, वायू, भू, ध्वनी प्रदूषण, वातावरणीय बदल, प्लॅस्टिक कॅरी बॅग/पिशव्या, थर्माकॉल, घनकचरा, जैविक कचरा, ई-कचरा, पर्यावरणस्नेही भारतीय सण साजरीकरण, जैवविविधता, विविध अधिवास, नैसर्गिक संसाधने- पाणी, वीज, इंधन इत्यादींच्या वापराबाबत तसेच रेन वॉटर हारवेस्टींग, अपारंपारीक ऊर्जा स्त्रोतांचा वापर, वस्तूंच्या पूनर्वापराबाबत इत्यादींच्या जनजागृतीसाठी चर्चा सत्र, व्याखाने, बैठका, प्रशिक्षण, कार्यशाळा, सर्वेक्षण, निसर्ग/वन सहली, प्रभात फ़ेरी, गट चर्चा, पारितोषिक स्पर्धा, सेमिनार, शिवार फ़ेरी, प्रात्यक्षिके, व्हिडीओ शो, प्रदर्शने, शिबीर, कॅम्प, ग्राम मेळा इ.आयोजन करणे, पर्यावरण रक्षण समितीचे गठण, नेचर क्लबचे गठण, भाडेतत्त्वावर पर्यावरणस्नेही वाहन- सायकल सेवा उपलब्ध करुन देणे, पोस्टर, घोषवाक्य,पत्रक, स्टीकर, होर्डींगच्या माध्यमातून जनजागृती.

६) पथनाट्य, एकांकिका/नाटिका/नाट्यप्रयोग, लोककला, संतवाणी- कीर्तनकार/प्रवचनकार, सांस्कृतिक कार्यक्रम, लोकभाषेद्वारे, चित्रपट, लघुचित्रपटद्वारे जनजागृती.

७) बचत गटाच्या माध्यमातून कापडी पिशव्यांचे, पक्ष्यांच्या लाकडी घरट्यांचे वाटप.

८) ग्रामीण भागातील शेतक-यासाठी पर्यावरण जनजागृती अभियान.

अशा स्वरुपाच्या संकल्पना या योजनेत आतापर्यंत विचारात घेतल्या असल्यामुळे त्या आता या योजनेच्या कार्यकक्षेत अंतर्भूत होणार नाही.

२. प्रस्तावित नाविन्यपूर्ण संकल्पनेची अंमलबजावणी प्रत्यक्षरित्या किमान सहा (६) महिन्यांच्या कालावधीसाठी झालेली असली पाहिजे अथवा प्रस्तावित नाविण्यपूर्ण संकल्पनेचे उदिष्ट मूर्त/द्दष्य स्वरूपात दाखविणे शक्य असले पाहिजे.

३. प्रस्तावित संकल्पनेची सद्यस्थितीतील यशस्विता, संकल्पनेची अन्य ठिकाणी पुनरावृत्ती होण्याची क्षमता, प्रकल्प नजीकच्या काळात स्वयंपूर्णरित्या चालविण्याची क्षमता व प्रकल्पाचा व्यापक परिणाम या चार निकषांच्या आधारे विहित प्रपत्रात प्राप्त माहितीच्या आधारे प्रस्ताव विचारार्थ घेण्यात येईल.

४. प्रस्ताव सादर करावयाची संकल्पना स्थानिक पर्यावरणाशी संबंधित विशिष्ट समस्या/विषयावर आधारित असावी. विशेषतः दि. ५ जून या जागतिक पर्यावरण दिना निमित्त जगभर साज-या होणा-या संकल्पनेवर आधारीत प्रस्तावांचा प्राथम्याने विचार केला जाईल. आवश्यकतेनुसार वेळोवेळी सुकाणू समिती याबाबत निर्णय घेईल.

**ब) प्रस्ताव निवडण्याची कार्यपद्धती:-**

१. दरवर्षी दि. ५ जून रोजी साजरा होणाऱ्या जागतिक पर्यावरण दिनापासून त्याचवर्षीच्या दि.३० सप्टेंबर या कालावधीत विहित नमुन्यात सादर होणारे प्रस्ताव त्या त्या वर्षासाठी सर्वसाधारणपणे विचारार्थ घेण्यात येतील.

२. प्रस्ताव सादर करण्याचा अर्जाचा नमूना सोबत प्रपत्र “अ” येथे जोडण्यात आलेला असून त्यानुसार प्रस्ताव विहित कालावधीत त्या त्या वर्षी सादर करण्यात यावा.

३. प्रस्ताव नोंदणीकृत पोच/पावतीद्वारे (रजिस्टर एडी) पर्यावरण विभागास अथवा पीडीएफ (Pdf) स्वरूपात envmantra-mh@nic.in या ई-मेलवर पाठविण्यात यावा.

४. दरवर्षी दि. ३० सप्टेंबर पर्यंत प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांची यादी mahenvis.nic.in या संकेतस्थळावर त्यावर्षीच्या दि. ३० ऑक्टोबर पर्यंत उपलब्ध करण्यात येईल.

५. विहित प्रपत्रात सादर अर्जाची निकषांच्या आधारे प्राथमिक छाननी करून त्यावर्षी विचारात घ्यावयाच्या प्रस्तावाची यादी अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांच्या मान्यतेने पर्यावरण विभागामार्फत निश्चित करण्यात येईल.

६. महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ यांचेकडून विचाराधीन संकल्पनांचे- ती संकल्पना प्रत्यक्षरित्या किमान सहा (६) महिन्यांच्या कालावधीसाठी अंमलबजावणी झालेली असल्याबाबतची अथवा प्रस्तावित नाविन्यपूर्ण संकल्पनेचे उदिष्ट मूर्त/द्दष्य स्वरूपात साध्य केलेले असल्याबाबतची छाननी करण्यात येईल. याबाबतचा अहवाल महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ यांचेकडून प्राप्त करून घेण्यात येईल.

७. महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ यांचेमार्फत प्राप्त अहवालाच्या आधारे पर्यावरण विभागामार्फत प्रस्ताव सुकाणू समितीसमोर विचारार्थ ठेवण्यात येतील.

८. सुकाणू समितीच्या निर्णयानुसार शासन मान्यतेने पुढील कार्यवाही पर्यावरण विभागामार्फत करण्यात येईल.

**क) सुकाणू समिती:-**

हरित संकल्पना (ग्रीन आयडियाज्) योजनेंतर्गत सुयोग्य प्रस्तावांच्या निवडीसाठी तसेच मंजूर प्रकल्पांचा नियमित आढावा घेण्यासाठी पुढील प्रमाणे सुकाणू समिती गठीत करण्यात येत आहे-

| | |
|---|---|
| अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव (पर्यावरण) | अध्यक्ष |
| उपसचिव, वित्त विभाग<br>("पर्यावरण" विकासशिर्ष हातळणारे संबंधित उपसचिव) | सदस्य |
| उपसचिव, नियोजन विभाग<br>("पर्यावरण" विकासशिर्ष हातळणारे संबंधित उपसचिव) | सदस्य |
| उपसचिव, नगर विकास विभाग<br>(प्रधान सचिव,नगरविकास विभाग यांनी प्राधिकृत केलेले) | सदस्य |
| उपसचिव, ग्राम विकास व पंचायत राज (ग्रामविकास) विभाग<br>(प्रधान सचिव,ग्रामविकास विभाग यांनी प्राधिकृत केलेले) | सदस्य |
| उपसचिव, (अर्थसंकल्प-पर्यावरण विभाग) | सदस्य |
| सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ तथा सदस्य सचिव यांनी प्राधिकृत केलेला प्रतिनिधी | सदस्य |
| निमंत्रीत सदस्य* | निमंत्रीत सदस्य |
| शास्त्रज्ञ-१, पर्यावरण विभाग | सदस्य सचिव |

*अध्यक्ष, यांच्या मान्यतेने प्राप्त होणाऱ्या संकल्पनेच्या विषयानुरूप निमंत्रित सदस्य निश्चित करण्यात येईल.

**ड) आर्थिक सहाय्य:-**

१. प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्यशासनामार्फत एकूण खर्चाच्या जास्तीत जास्त ७५% एवढा हिस्सा देय असेल.

२. सदर हिस्सा प्रकल्पाच्या कालावधीनुसार व निधीच्या उपलब्धतेनुसार निश्चित करण्यात येईल.

३. राज्य शासनाचे आर्थिक सहाय्य व प्रकल्प धारकाचा हिस्सा यांचे ७५ :२५ हे प्रमाण प्रकल्प मंजूरीनंतर एकूण प्रस्तावित खर्चासाठी लागू राहील. यात प्रस्ताव धारकाने यापुर्वी केलेला प्रत्यक्ष खर्च विचारात घेण्यात येणार नाही.

**इ) सुकाणू समितीच्या कार्यकक्षा:-**

१) प्राप्त प्रस्तावांपैकी सुयोग्य प्रस्तावांची निवड करणे.

२) निवड झालेल्या प्रस्तावांच्या प्रत्यक्ष अंमलबजावणीसाठी सूचना देणे, बदल सूचविणे.

३) निवड झालेल्या व्यक्ती/संस्था यांना द्यावयाच्या निधीबाबत निर्णय घेणे तसेच निधी वितरणाची कार्यपध्दती ठरविणे.

४) निवड झालेल्या प्रकल्पांची सुयोग्य अंमलबजावणीसाठी सर्व कार्यवाही जसे, प्रत्यक्ष भेटी देणे, अहवाल मागविणे, मुल्यांकन करणे इत्यादी. यासाठी आवश्यकतेनुसार महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळाचे सहाय्य घेण्यात येईल.

५) सदस्य सचिव, सुकाणू समिती यांनी या योजनेसाठी वेळोवेळी उद्भवणाऱ्या बाबीच्या अनुषंगाने मांडलेल्या प्रस्तावांवर निर्णय घेणे.

**ई) योजनेचा खर्च:-**

सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितिकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण प्रतिबंध व नियंत्रण,१०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध, (०२)(१३) पर्यावरण विषयक जनजागृती, शिक्षण व वातावरण बदल कृति योजना (३४३५ १३०२), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली नोंदवावा व संबंधित आर्थिक वर्षी उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२१७११४४०११४०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Mahendra Babusing Hajari
Date: 2017.02.17 11:45:31 +05'30'

**( म.बा. हजारी )**
**उपसचिव, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
२. सर्व सन्माननीय विधानसभा / विधान परिषद सदस्य, संसद सदस्य
३. मा. राज्यपालाचे सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
५. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

९. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
११. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मंबई.
१२. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मंबई
१३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मंबई
१४. प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायत राज (ग्रामविकास) विभाग, मंत्रालय, मंबई
१५. प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१६. सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ
१७. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१८. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१९. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती.

शासन निर्णय क्र. इएनव्ही -२०१६/प्र.क्र.२८/तां.क.३, दिनांक ०८ नोव्हेंबर, २०१६ सोबतचे “प्रपत्र-अ”

**“प्रपत्र-अ”**

**हरित संकल्पना (ग्रीन आयडीयाज) योजनेंतर्गत सादर करावयाच्या अर्जाचा विहित नमुना**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ) संस्थेची माहिती** | | | | | |
| १. संस्थेचे नाव व पत्ता : | | | | | |
| २. संपर्क व्यक्ती: | | ३. दूरध्वनी क्रमांक : | | ४. दूरध्वनी क्रमांक (भ्रमणध्वनी): | |
| ५. फॅक्स क्रमांक: | | ६. ई:मेल- | | | |
| ७. संस्थेचा प्रकार (योग्य पर्याय निवडावा), नोंदणी तपशील (नोंदणी दाखल्याची प्रत सोबत जोडावी) | | | | | |
| शैक्षणिक | ☐ | अशासकीय संस्था | ☐ | खाजगी संस्था | ☐ |
| सार्वजनिक क्षेत्र | ☐ | सहकारी संस्था | ☐ | वैयक्तिक | ☐ |
| ट्रस्ट | ☐ | शासकीय यंत्रणा | ☐ | इतर ( कृपया प्रकार स्पष्ट करावा) | ☐ |
| ८. संस्थाव्यक्ती/ यांचा तपशील (स्थापना, दिनांक सहित) व संस्थेविषयीचा कामाचा तपशील (जास्तीत जास्त ५० शब्द) (इतर कागदपत्रे सोबत जोडू नये) | | | | | |
| **ब) प्रस्तावाविषयीची प्राथमिक माहिती** | | | | | |
| ९. प्रस्तावाचे नाव : | | | | | |
| १०. प्रस्ताव कार्यरत करण्याचे क्षेत्र | | | | | |
| ११. संकल्पना: | | | | | |
| १२.आपण वा आपली संस्था इतर संस्थेच्या सहकार्याने प्रकल्प राबविणार आहे का ? (होय / नाही) | | | | | |
| १३. प्रश्न क्र.१२ चे उत्तर होय असल्यास, संबंधित संस्थेचे नाव व संपर्क तपशील: | | | | | |
| **क) प्रस्तावाचा तपशील** | | | | | |

| |
|---|
| १४. उद्देश: आपला प्रस्ताव हा कोणत्या मूलभूत समस्येशी संबंधित असून त्या मूलभूत समस्येने साधारणत: किती लोक प्रभावित आहेत ? |
| १५. संकल्पना: वरील समस्या निराकरणाविषयी आपली सविस्तर संकल्पना. |
| १६. अंमलबजावणी : आपण आपल्या संकल्पनेची अंमलबजावणी कशी करणार ? आपण हाती घेणार असलेले उपक्रम व प्रस्तावाच्या उद्देशपूर्तीसाठी करणार असलेल्या कार्यवाहीचा तपशील. |
| १७. उद्दिष्टपूर्ती/प्रकल्पाची यशस्वितता :प्रकल्पाची अंमलबजावणी आतापर्यंत कशी केली आहे याचे विवरण खर्चाच्या तपशिलासह |
| १८. प्रकल्पाची अंमलबजावणी करण्यात आलेल्या प्रत्यक्ष स्थळाचा तपशिल/पत्ता, प्रस्तावाची अमलबजावणी मूर्त/दृश्य स्वरुपात झालेली असल्यास त्याचे छायाचित्र जोडावे. |
| १९. प्रकल्पाची आतापर्यंत झालेल्या अंमलबजावणीचा तपशिल. |
| २०. प्रस्तावित संकल्पनेची सद्यस्थितीतील यशस्विता व ते पडताळण्याची कार्यपध्दती. |
| २१. प्रस्तावित संकल्पनेची अन्य ठिकाणी पुनरावृत्ती होण्याची क्षमता व ते पडताळण्याची कार्यपध्दती. |
| २२. प्रकल्प नजीकच्या काळात स्वयंपूर्णरित्या चालविण्याची क्षमता व ते पडताळण्याची कार्यपध्दती. |
| २३. प्रस्तावित प्रकल्पाचा व्यापक परिणाम व ते पडताळण्याची कार्यपध्दती. |
| २४. प्रस्तावित प्रकल्पासाठी शासन अनुदानाची आवश्यकता याबाबत कारणमिमांसा. |
| **ड) प्रकल्पाचा खर्च** |
| २५. प्रस्तावित प्रकल्पासाठी खर्चाच्या प्रस्तावित बाबी व खर्चाचे अंदाज. |

उपरोक्त सादर माहिती पूर्णपणे खरी असून सदर माहितीत कोणतीही तफ़ावत आढळल्यास प्रस्ताव कोणत्याही स्तरावर रद्द होऊ शकतो, याबाबत मला पूर्णपणे जाणिव आहे.

प्रस्तावधारकाची सही